**समाजामध्ये जागरुकता, धार्मिक सलोखा निर्माण करुन गुन्हेगारीचे प्रमाण कमी करण्याकरिता पोलीसांमार्फत राबविण्यात येणा-या विविध उपक्रमांवरील होणारा खर्च एकत्रितपणे दिसण्याकरिता व सुसूत्रतेच्या दृष्टीने “Community Policing” ही योजना अंमलात आणण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एनएएक्स १०१७/प्र.क्र.३०५/विशा-१ब,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १८ जानेवारी, २०१९

<u>वाचा:</u>- १. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: एनएएक्स १०१७/प्र.क्र.३०५/विशा १ब, दि.१२.०१.२०१८
२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र. पोमसं/३३/ कम्युनिटी पोलिसिंग /४६/२०१६, दि.३.१०.२०१८ चे पत्र
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.पोमसं/३३/७१२५/ हिवाळी अधिवेशन २०१८/६६/२०१८, दि.१६.१०.२०१८ चे पत्र

**<u>प्रस्तावना :</u>**

राज्यात सर्व धर्म, जाती /जमातीचे लोक राहत असून त्यांच्यामध्ये बंधुभाव, मैत्रीचे संबंध राहणे आवश्यक आहे. धार्मिक सण,उत्सव व मिरवणुका इत्यादीच्या वेळी ताणतणाव, मतभेद निर्माण होणार नाहीत यासाठी आवश्यक ती काळजी घ्यावी लागते. आवश्यक ती काळजी घेऊनही दुर्दैवाने काही अनुचित प्रकार घडल्यास सर्व जाती/धर्माच्या प्रमुख व्यक्तींच्या सहकार्याने प्रकरणे चिघळणार नाहीत यासाठी सातत्याने प्रयत्न करावे लागतात. त्याचप्रमाणे जनतेचा पोलीसांच्या कामामध्ये सहभाग घेऊन गुन्हेगारीचे प्रमाण कमी करणे, जनतेच्या मनात पोलीसांबद्दल गाढ विश्वास निर्माण करुन जनता व पोलीस यांच्यामध्ये सुसंवाद निर्माण करणे, यासाठी मोहल्ला एकता समिती, शांतता समिती, मोहल्ला पंचायत, तंटामुक्त समिती, पोलीस मित्र आणि इतर छोटे स्थानिक पातळीवरचे उपक्रम राबवून स्थानिक पोलीसांनी यापूर्वीच शांतता राखणे असे उपक्रम राबवावे लागतात.

२. उपरोक्त उपक्रमापैकी काही उत्तम उपक्रम पुरेशा निधीअभावी प्रभावी रितीने कार्यरत राहत नाहीत. त्यामुळे मुख्यलेखाशीर्ष २०५५ या खाली नवीन उपलेखाशीर्ष चालू करुन व स्वतंत्र सांकेतांक निर्माण करुन राज्यात जनता व पोलीस समन्वय (Community Policing) ही संकल्पना राबविणे आवश्यक झाले होते. स्वतंत्र संगणक सांकेतांकानुसार गृह विभागातील विविध कार्यासनामधून राबविण्यात येणा-या उपक्रमांची धोरणात्मक अंमलबजावणी त्याच कार्यासनामार्फत सुरु राहणार असून त्यामध्ये कोणताही बदल होणार नाही. या उपक्रमांवर होणारा खर्चही शासनाच्या प्रचलित धोरणानुसारच होणार असल्याने शासनावर कोणत्याही प्रकारचा अतिरिक्त आर्थिक भार पडणार नाही. केवळ उपरोक्त उपक्रमांवरील होणारा खर्च एकत्रितपणे दिसण्याकरिता सुसूत्रतेच्या व ताळमेळाच्या

दृष्टीने “Community Policing ”ही योजना /संकल्पना राबविण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यात स्थानिक जनतेच्या सहकार्याने पोलीसांमार्फत जातीय तणाव प्रतिबंधक उपाययोजना, गुन्हयांना प्रतिबंध, उपक्रमामध्ये युवकांचा सहभाग, ज्येष्ठ नागरिकांची सुरक्षा, जनजागृती मोहिमेद्वारे लोक सहभाग, जनतेशी सुसंवाद इ. साठी मोहल्ला एकता समिती, शांतता समिती, मोहल्ला पंचायत, तंटामुक्त समिती, पोलीस मित्र आणि इतर छोटे स्थानिक पातळीवरचे उपक्रम राबविणे व त्यांची प्रभावीपणे व कार्यक्षमपणे अंमलबजावणी करण्याकरिता २०५५ या मुख्यलेखाशीर्षाखाली जनता व पोलीस समन्वय (Community Policing) ही योजना /संकल्पना राबविण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन क्रमांक:एनएएक्स १०१७/प्र.क्र.३०५/विशा १ब, दि.१२.०१.२०१८ च्या शासन निर्णयान्वये क्रमांक २०५५ A११२ हा संगणक सांकेतांक घेण्यात आला असून या संगणक सांकेतांकानुसार गृह विभागातील विविध कार्यासनामधून राबविण्यात येणा-या उपक्रम त्याच कार्यासनामार्फत राबविण्यात येणार आहेत. त्यामध्ये कोणताही बदल न करता उपक्रमांवरील होणारा खर्च एकत्रितपणे दिसण्याकरिता व ताळमेळाच्या दृष्टीने “Community Policing” ही योजना नवीन उपलेखाशीर्षाखाली राबविण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

“Community Policing” अंतर्गत समाजामध्ये सामंजस्य निर्माण करण्यासाठी वेगवेगळया माध्यमातून विविध पातळीवर विविध वयोगटाच्या नागरिकांसाठी त्यांच्या स्तरावरचे विविध प्रकारचे प्रोत्साहनपर कार्यक्रम राबविणे, वक्तृत्व, वादविवाद स्पर्धा इत्यादी बौध्दिक पातळीवरील स्पर्धांचे आयोजन करणे, तरुण, हौशी नागरिकांसाठी क्रिकेट स्पर्धा, ज्येष्ठ नागरिकांसाठी बुध्दिबळ, कॅरम इत्यादी स्पर्धांचे आयोजन करणे, विविध प्रकारच्या गुन्हयांच्या अनुषंगाने जनतेमध्ये जागरुकता निर्माण करण्यासाठी तज्ञ व्यक्तींच्या मार्गदर्शनाखाली विविध प्रकारची शिबीरे आयोजित करणे, नागरिक व पोलीस यांचे मेळावे घेणे इत्यादी कार्यक्रमांचा समावेश करण्यात यावा.

उपरोक्त कार्यक्रम राबविण्याकरिता सभागृह, मैदान भाडयाने घेणे, मार्गदर्शनासाठी येणा-या व्यक्तींचे मानधन देणे, शिबीर खर्च, जागृतीकरिता भित्तीपत्रके तयार करणे /लावणे, तसेच, बाल/ युवा/ज्येष्ठ नागरिक यांच्यासाठी घेण्यात आलेल्या स्पर्धांकरिता पारितोषिके अशा स्वरुपाचा खर्च होणे अपेक्षित आहे. गुन्हे प्रतिबंधात्मक उपाययोजना राबविण्याचा खर्च यामध्ये (गस्त वाढविणे) अंतर्भूत असेल.

उपरोक्त उपक्रम हे गृह विभागातील विविध कार्यासनामधून राबविण्यात येत असल्याने लेखा परिक्षणाच्या अनुषंगाने संबंधित कार्यासनाच्या उपक्रमाच्या अनुषंगाने उपस्थित होणा-या आक्षेपांबाबतची व विधानमंडळ विषयक आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी ही संबंधित कार्यासनांची राहील.

“Community Policing” या योजनेमधील निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी संबधित घटक प्रमुख (पोलीस आयुक्त /पोलीस अधिक्षक) यांना नियंत्रण अधिकारी तर त्यांच्या अंतर्गत आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर योजनेची अंमलबजावणी व संनियंत्रणाची सर्वसाधारण जबाबदारी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११९१७४७३०१३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Damodar Patil

Digitally signed by Vijay Damodar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay Damodar Patil
Date: 2019.01.19 17:55:08 +05'30'

**( विजय पाटील )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३. सर्व मा.मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा /विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
५. सर्व विधानसभा /विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
८. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९. सर्व मंत्रालयीन अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ०३२
११. महालेखापाल (१/२), महाराष्ट्र राज्य, (ले.अ.)/(ले.प.), मुंबई/नागपूर
१२. पोलीस आयुक्त (सर्व)
१३. पोलीस अधिक्षक, सर्व
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१५. गृह विभागातील सर्व सह सचिव /उप सचिव,
१६. वित्त विभाग, व्यय-७/अर्थ-११,अर्थोपाय, मंत्रालय मुंबई
१७. अर्थसंकल्प शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१८. निवडनस्ती.